महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) योजनेकरिता नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : लेखाशि-२०२०/प्र.क्र.९ /महामंडळे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०५ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास प्रवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग तसेच इतर वंचित आणि दुर्लक्षित घटकांच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक विकासासाठी विद्यार्थी, युवक-युवतींसाठी विविध कार्यक्रम व उपक्रम राबविण्यासाठी सारथी संस्थेच्या धर्तीवर महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महोज्योती), पुणे येथे स्थापन करण्यात आली असून महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) मेमोरंडम ऑफ असोसिएशन व आर्टिकल ऑफ असोसिएशनला मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, दि. १९/०९/२०१९रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून त्यास अनुसरून नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती)" मागणी क्र.झेडजी-०३, प्रधान लेखाशिर्ष २२२५ अंतर्गत नवीन उप शीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

नवीन लेखाशिर्षाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| शिर्षक | लेखाशिर्षाचे मराठी नाव | लेखाशिर्षाचे इंग्रजी नाव |
|---|---|---|
| मागणी क्र. | झेडजी-०३ | ZG-03. |
| प्रधान लेखाशिर्ष | २२२५ ,अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण | 2225, Welfare of Scheduled Castes, Scheduled Tribes, Other Backward Classes and Minorities |
| उपप्रधान लेखाशिर्ष | ०३, मागासवर्गीयांचे कल्याण | 03 , Welfare of Backward Classes |
| गौण लेखाशिर्ष | १०२, आर्थिक विकास | 102, Economic Development |
| गट लेखाशिर्ष | (०१) विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण | (01)Welfare of Vimukta Jati Nomadic Tribes Other Backward Classes and Special Backward Classes. |
| उप लेखाशिर्ष | (०१)(०९) महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) | (01)(09) Mahatma Jyotiba Phule Reasearch and Training Institute (MAHAJYOTI) |
| अनिवार्य/कार्यक्रम | (कार्यक्रम)/दत्तमत | Scheme/Voted |
| संगणक सांकेतांक | २२२५ एफ ४९७ | 2225 F 497 |

२. हे आदेश महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी) - १, महाराष्ट्र, मुंबई यांच्याशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ख.वि/चा-१/विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग/युओआर-१७८/२०१९-२० /११२९, दि.१३/०२/२०२० तसेच, वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.०९/२०२०/ व्यय - १४, दि. २४/०१/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३०५१२०८२०९४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA
VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6f
d67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e2
22c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT,
o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO
GURAV
Date: 2020.03.05 12:11:13 +05'30'

**( रविन्द्र गुरव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (TM Section) महाराष्ट्र, मुंबई
४) कार्यासन व्यय-१४ / अर्थसंकल्प-५, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
५) कार्यासन-१४१३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), पुणे.
७) निवड नस्ती.